सामान्य राज्य सेवा गट-ब या संवर्गामधील कनिष्ठ किटकशास्त्रज्ञ, गट-ब मधील रिक्त पदांवर श्रेणी अवनत करून बदलीने पदस्थापना देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

शासन आदेश क्रमांक संआसे-२०२२/प्र.क्र.९०/सेवा-१
गोकुळदास तेजपाल रूग्णालय संकुल इमारत,
८ वा मजला, लोकमान्य टिळक मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ००१
दिनांक : २८ एप्रिल, २०२२.

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम,२००५ च्या कलम ४ (४)(दोन) व कलम ४(५) मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिका-यांच्या मान्यतेने सामान्य राज्य सेवा गट-ब या कनिष्ठ किटकशास्त्रज्ञ या संवर्गातील रिक्त पदांवर श्रेणी अवनत करून खालील कर्मचा-यांची खालीलप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | कर्मचा-यांचे नाव, पद व सध्याचे मुख्यालयाचे ठिकाण | कनिष्ठ किटक शास्त्रज्ञ, गट-ब या पदावर श्रेणी अवनत करुन बदलीचे ठिकाण. |
|---|---|---|
| १. | श्री.एस.जी.चव्हाण आरोग्य पर्यवेक्षक, जिल्हा हिवताप अधिकारी,ठाणे. | सहाय्यक संचालक आरोग्य सेवा हिवताप, अकोला |
| २. | श्री.व्ही.के.सहाणे,(प्रयोगशाळा वैज्ञानिक अधिकारी) प्रा.आ.कें.जवळे दिघे,ता.संगमनेर,जि.अहमदनगर | सहाय्यक संचालक आरोग्य सेवा हिवताप, नाशिक |
| ३. | श्री.सुनील गंगाधर राऊत, (प्रयोगशाळा वैज्ञानिक अधिकारी),जिल्हा हिवताप,जि.बीड. | सहाय्यक संचालक आरोग्य सेवा हिवताप, औरंगाबाद |
| ४. | श्री.सोमाजी अनुसे (प्रयोगशाळा वैज्ञानिक अधिकारी) सहाय्यक संचालक आरोग्य सेवा(हि),कोल्हापूर. | सह संचालक आरोग्य सेवा हिवताप,हत्तीरोग व जलजन्यरोग, पुणे (मुख्यालय) |
| ५. | श्री.एस.आ.कार्लेकर(प्रयोगशाळा वैज्ञानिक अधिकारी)हत्तीरोग रात्र चिकित्सालय कान्होलीबारा, रा.ह.नि.पथक नागपूर. | संचालक राज्य आरोग्य कुटुंब कल्याण प्रशिक्षण संस्था, नागपूर अंतर्गत संशोधन व प्रशिक्षण केंद्र नागपूर. |

२. उक्त कर्मचा-यांना कनिष्ठ किटकशास्त्रज्ञ या संवर्गातील पदावर श्रेणी अवनत करून बदलीने पदस्थापना करण्यात आल्याने त्यांना सदर पदावर नियमित पदोन्नतीचा हक्क सांगता येणार नाही अथवा सेवा जेष्ठतेचा दावा करता येणार नाही . तसेच कनिष्ठ किटकशास्त्रज्ञ या पदाची वेतनश्रेणी त्यांना अनुज्ञेय राहणार नाही. कनिष्ठ किटकशास्त्रज्ञ यापदावर पदोन्नतीने/नामनिर्देशनाने नियमित अधिकारी उपलब्ध झाल्यास सदर कर्मचाऱ्यांना त्यांच्या मूळ संवर्गात बदलीने पदस्थापना देण्यात येईल.

३. बदली करण्यात आलेल्या अधिका-यांना त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरिता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे आणि संबंधित कर्मचा-यांने त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संचालक, आरोग्य सेवा, पुणे व शासनास सादर करावा.

४. बदली झालेल्या कर्मचा-यांना कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये, अथवा रजा मंजूर करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

५. बदली झालेल्या कर्मचाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर अनुज्ञेय पदग्रहण अवधीत नवीन पदस्थापनेवर रूजू व्हावे. जे कर्मचारी या कालमर्यादेचे पालन करणार नाहीत आणि पदस्थापेच्या ठिकाणी हजर न होता परस्पर गैरहजर राहतील अशा कर्मचाऱ्यांची अनुपस्थिती “अनधिकृत अनुपस्थिती” म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड होईल याची जाणीव सर्व संबंधितांना करून देण्यात येत आहे.

६. जे कर्मचारी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणार नाहीत त्यांच्या विरूध्द आयुक्तालयाने वेळीच कारवाई सुरू करावी व शासनास अवगत करावे व अनुपालन अहवाल शासनास विहित कालमर्यादेत सादर करावा.

७. बदलीच्या आदेशात बदल करून घेण्यासाठी कोणीही प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास संबंधित कर्मचारी शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

८. सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२१७१७४३३९६८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PREMANAND DYANESHWAR SONTAKKE

Digitally signed by PREMANAND DYANESHWAR SONTAKKE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=248f3abd919bce9c4e68555abc7e467b111c53a87e167edcc566a40a12ae53cd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=89357E84059779C4AD0939BABA47BE1D7999CB1D37B914BDF76F412B21AAC1AF, cn=PREMANAND DYANESHWAR SONTAKKE
Date: 2022.04.28 11:27:23 +05'30'

**प्रे.ज्ञा.सोनटक्के**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा),महाराष्ट्र राज्य,मुंबई.नागपूर/
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक-१/२ आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई/पुणे.
४. सह संचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन), मुंबई.
५. सहसंचालक, आरोग्य सेवा (हिवताप, हत्तीरोग व जलजन्यरोग), पुणे
६. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, पुणे कार्यालय.
७. उप संचालक, आरोग्य सेवा, (सर्व परिमंडळे)
८. जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

९. सहा.संचालक, आरोग्य सेवा (हिवताप) (सर्व)
१०. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व जिल्हे)
११. राज्य आरोग्य कुटुंब कल्याण प्रशिक्षण संस्था, नागपूर
१२. जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा सामान्य रुग्णालये (सर्व)
१३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुबई/नागपूर.
१४. सर्व संबंधित अधिकारी, गट-ब (संचालक, आरोग्य सेवा पुणे यांचे मार्फत)
१५. सार्वजनिक आरोग्य विभाग, निवडनस्ती (सेवा-१).